२ टक्के स्वेच्छाधिकारातून प्राधान्य तत्वानुसार मा.मंत्री (गृ.नि.) यांच्या आदेशानुसार वितरीत करण्यात येणाऱ्या सदनिकांचे प्रवर्ग निहाय आरक्षण रद्द करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृहनिर्माण विभाग,
## शासन निर्णय, क्र. गृनिवा-११२२/प्र.क्र.४६/गृनिधो-२,
## मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
## दिनांक : ३१ डिसेंबर २००२.

**संदर्भ** : १) शासन निर्णय, गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, क्र.एजीएन-११८४/(२३८८)/का.९, दि. १४ जुलै, १९८६

२) शासन निर्णय, गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, क्र. गृनिवा ११९१/११२४/स्वेनि-१, दिनांक १५ जुलै, १९९७.

प्रस्तावना :-

संदर्भाधिन शासन निर्णयानुसार महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाच्या अखत्यारीतील विभागीय गृहनिर्माण मंडळाकडून बांधण्यात येणाऱ्या वेगवेगळया उत्पन्न गटाच्या घरबांधणी योजनांमधून मा. मुख्यमंत्र्याच्या २ टक्के स्वेच्छाधिकाराखाली शासन नामनिर्देशित व्यक्तींना उपलब्ध असलेल्या आरक्षित कोटयातील सदनिकांच्या वाटपाबाबत निकष व पवर्ग ठरविण्यात आले आहेत. त्यानुसार उपलब्ध सदनिकांपैकी ५० टक्के सदनिका पात्र लाभार्थ्यांना ज्यष्ठता यादीनुसार मा. मंत्री(गृहनिर्माण) यांच्या संमतीने वितरीत करण्यात येतात आणि उर्वरीत ५० टक्के सदनिका मा.मंत्री(गृहनिर्माण) स्वेच्छाधिकारातून विविध प्रवर्गातून विविध प्रवर्गातील पात्र लाभार्थींची जागेची अत्यंतिक निकड लक्षात घेऊन संदर्भाधिन शासन निर्णय, दि. १४ जूलै, १९८६ आणि दि. १५ जुलै, १९९७ अन्वये वाटपाबाबतच्या निकषाचा अवलंब करुन प्रवर्गनिहाय विहित केलेल्या टक्केवारीनुसार प्राधान्याने वितरीत करण्यात येतात. म्हाडाने बाधलेल्या सदनिका विक्रीस काढतांना त्यामध्ये महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास (जमिनीचे वाटप) नियम १९८१ च्या नियम १३ नुसार वेगवेगळया प्रवर्गातील व्यक्तींसाठी ठेवण्याची आवश्यकता नाही. तसेच असे आरक्षण(प्रवर्ग) पुन्हा शासन नामनिर्देशित व्यक्तीसाठी ठेवण्याची आवश्यकता नाही. तसेच अलिकडच्या काळात २ टक्के स्वेच्छाधिकाराखाली उपलब्ध होणाऱ्या सदनिकांची संख्या फारच कमी झाली आहे. वा सर्वच प्रवर्गातील अर्ज प्राप्त होत नाहीत. त्यामुळे प्रत्यक्षात वितरण करतांना प्रवर्गनिहाय आरक्षण कोटयानुसार वाटप करणे शक्य होत नाही. सबब, मा.मंत्री (गृहनिर्माण ) यांची स्वेच्छाधिकारातून वितरीत करण्यात यावयाच्या सदनिका वितरण करतांना

ठरविण्यात आलेले प्रवर्ग रद्द करण्यासंदर्भातील प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या प्रस्तावावर साकल्याने विचार केल्यानंतर आता शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

शासन निर्णय :-

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मा. मंत्री(गृहनिर्माण) यांच्या स्वेच्छाधिकारात ५० टक्के सदनिका प्राधान्य आदेशानुसार पात्र लाभार्थ्यांना वितरीत करताना निश्चित करण्यात आलेला प्रवर्ग करावयाचे ५० टक्के सदनिकांचे प्रमाण कायम राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( व. दा. राठोड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति

१. राज्यपालांचे सचिव
२. मुख्यमंत्र्यांचे पधान सचिव
३. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. मा.मंत्री (गृनि) यांचे खाजगी सचिव
५. राज्यमंत्री (गृनि) यांचे खाजगी सचिव
६. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
७. मुख्य सविव
८. प्रधान सचिव/गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. सर्व मंत्रालयीन विभागाचे सचिव
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई-३२
११. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, बांद्रे(पूर्व), मुंबई-५१.
१२. सर्व अधिकारी, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. सर्व मुख्य अधिकारी, मुंबई, पुणे, नागपूर, औरंगाबाद, कोकण अमरावती, नाशिक गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ.
१४. सर्व मंत्रालयीन विभाग
१५. निवड नस्ती/गृनिधो-२.